अौरंगाबाद मध्यवर्ती कारागृहासाठी
नवीन रुग्णवाहिका खरेदी करणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,

शासन निर्णय, क्रमांक. एमएजे ४५९३/३३६९[१४२]पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक :- २१ मे, १९९८.

वाचा :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक व्होईएच ५०२४/क3-७, दिनांक [illegible]

शासन निर्णय :- औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह हे औरंगाबाद शहरातील शासकीय रुग्णालयापासून सुमारे १० कि.मी. अंतरावर आहे. कारागृहातील बंदी दिवसा किंवा रात्री अचानक आजारी पडल्यास व त्याला शासकीय रुग्णालयामध्ये दाखल करावयाचे वेळ आल्यास, औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहाच्या परिसरात आजूबाजूस रिक्षा किंवा इतर वाहन उपलब्ध होऊ शकत नाही. तसेच औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहाच्या शासकीय वसाहतीत राहणारा शासकीय कर्मचारी किंवा त्यांचे कुटुंबिय मंडळींपैकी कोणी आजारी पडल्यास व त्या व्यक्तीस शासकीय रुग्णालयामध्ये त्वरित दाखल करण्याचा आणीबाणीचा प्रसंग उद्भवल्यास, त्यासाठी सुध्दा रिक्षा किंवा इतर वाहन त्वरित मिळणे दुरापास्त होते. त्यामुळे अत्यवस्थ रुग्णाच्या जीवितास धोका होण्याची शक्यता नाकारता येत नाही. औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह येथे टोळी युध्दातील, खतरनाक व गुंड बंदी आहेत. त्यांनी दाखल केलेल्या याचिकांचे सुनावणीबाबत व इतर शासकीय कामाबाबत अधिकाऱ्यांना व इतर अधिकाऱ्यांना औरंगाबाद शहरात जातेवेळी इतर वाहनांचा वापर करावा लागतो. सदरहू गोष्ट सुरक्षिततेच्या दृष्टीने ... अतिशय धोकादायक आहे, ही वस्तुस्थिती विचारात घेता रुग्णवाहिकेची असलेली आवश्यकता लक्षात घेता औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहाच्या आस्थापनेतील निर्लेखित करण्यात आलेल्या रुग्णवाहिकेऐवजी नवीन रुग्णवाहिका खरेदी करण्यासाठी रु. ३,९०,०००/- [रुपये तीन लाख नव्वद हजार फक्त] इतक्या खर्चास शासन या आदेशाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदरहू खर्च सन १९९८-९९ या वित्तीय वर्षात "२०५६-तुरुंग" "योजनेतर-००१ संचालन व प्रशासन-००१ [एक] कारागृह निरीक्षणालय" या लेखाशिर्षाखाली नवीन बाब भाग-दोन द्वारा मंजूर झालेल्या तरतुदीतूनच भागविण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भान्वये क्रमांक. सीआर ८१/९८/व्यय-८, दिनांक ९.३.९८ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ता. स. नाईक ]

अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

क्रमांक. एमएजे ०५९३/२३९९[१४२]/पीआरएस-२,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- 29 मे, १९९८.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक [मुख्यालय], महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, औरंगाबाद.

महालेखापाल-१/२, [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

महालेखापाल-१/२, [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.

अधिक्षक, औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह, औरंगाबाद.

वित्त विभाग [व्यय-८],

गृह विभाग, बोपुडो-१.

निवड नस्ती.